क्रमांक-सांबासा २००४/प्रक्र-२६४/मावक-५
सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व
विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ एप्रिल,२००४



प्रति :

विभागीय समाजकल्याण अधिकारी,
कोकण विभाग,
कोकण भवन, मुंबई

विषय : श्री.आनंद चंद्रशेखर पोळ यांना जाती पडताळणी प्रमाणपत्र देण्याबाबत

संदर्भ : (१) आपले अ.शा.प.क्रमांक-मुंवि/जाप्रप/रिपक २७३६/१९९८/६९६/
रश्रीचं/२००३-०४ दिनांक २५ मार्च,२००४
(२) रिट पिटीशन क्र.२७३६/१९९८ कुमारी रचना श्रीकांत चंपानेरी विरुध्द
महाराष्ट्र शासन

कृपया श्री.ओ.वाय.पोळ, सेवानिवृत्त लेफ्टनंट कर्नल यांचे दिनांक २८.४.२००४ चे पत्र पहावे.

२. श्री.ओ.वाय.पोळ, सेवानिवृत्त लेफ्टनंट कर्नल यांचा नातू श्री.आनंद चंद्रशेखर पोळ यांनी जातीच्या प्रमाणपत्राची पडताळणी करुन देण्याबाबत आपणाकडे आवश्यक त्या कागदपत्रांसह रितसर अर्ज केलेला आहे. याबाबत आपणास कळविण्यात येते की, संदर्भाधीन रिट पिटीशन क्रमांक २७३६/१९९८ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी असा निर्णय दिला आहे की, अर्जदाराकडे महाराष्ट्रातील कायम निवासासंबंधी सन १९५०च्या पुराव्याबाबत आग्रह धरु नये. श्री.अनंत चंद्रशेखर पोळ यांच्या आजोबांचा जन्म १५ ऑक्टोबर,१९३६ साली मु.हेबळ, ता.हूकेरी, जि.बेळगांव येथे झाला असून त्यावेळी बेळगांव मुंबई राज्यात होते. सन १ मे,१९६० मध्ये महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर पूर्वीच्या मुंबई राज्यातील कारवार, बेळगांव, विजापूर इत्यादि जिल्हयांचा कर्नाटक राज्यात समावेश करण्यात आला आहे. लेफ्टनंट कर्नल श्री.पोळ हे १९५४ साली मुंबईत स्थलांतरीत झाले असून ते दि.१६ सप्टेंबर,१९५७ पासून चंद्रोदय को.ऑप.हौ.सोसायटी,मुंबई-७१ येथे स्थायिक झाले आहेत. त्यांनी मुंबई येथील सन १९५४ चा वास्तव्य पुरावा आपल्याकडे सादर केला आहे.

३. रिट पिटीशन क्रमांक २७३६/१९९८ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार १९६० पूर्वीपासून त्यांचा स्थायी निवास महाराष्ट्रात आहे, हे पाहण्यात यावे आणि त्यानुसार समितीने निर्णय द्यावा.

( डॉ.मुन्शिलाल गौतम )
प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत, माहितीसाठी अग्रेषित :-
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी